**मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना लागू असलेली भविष्य निर्वाह निधीची कार्यवाही ऑनलाइन पद्धतीने करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शालार्थ-११२१/प्र.क्र.४७/टिएनटी - ३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १७ सप्टेंबर, २०२१

वाचा -

१) महाराष्ट्र मान्यताप्राप्त अनुदानित माध्यमिक शाळा भविष्य निर्वाह निधी नियमावली, १९७७
२) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण - २४१२/(८१-अ/१२)/अर्थसंकल्प, दिनांक ७.११.२०१२.

प्रस्तावना -

मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील पूर्णवेळ मान्यताप्राप्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीचे नियंत्रण शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून करण्यात येते. सर्व प्रकारची अग्रिमे / परतावे मंजूर करणे, वर्गणी जमा करणे, भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवणे, भविष्य निर्वाह निधीचा हिशोब करून संबंधितांना प्रत्येक वर्षी चिठ्ठ्या देणे, इत्यादी सर्व कामे जिल्हा स्तरावर शिक्षणाधिकारी यांचे नियंत्रणाखाली अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक यांचेमार्फत पार पाडली जातात. मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन शासन निर्णय दिनांक ७.११.२०१२ नुसार शालार्थ या ऑनलाईन प्रणाली मार्फत अदा करण्यात येत आहे. मात्र भविष्य निर्वाह निधीचे लेखे नोंदवहीमध्ये नोंदविले जातात. त्यामुळे काही प्रसंगी भविष्य निर्वाह निधी लेख्यांच्या हिशोब/परतावा वेळेवर दिला जात नाही, असे निदर्शनास आले आहे. यास्तव भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवणे, हिशोब देणे, अग्रीम / परताव्याची देयके अदा करणे, इत्यादी बाबी अद्ययावत अचूक व वेळेत निर्णय होण्याच्या दृष्टीने भविष्य निर्वाह निधीचे संपूर्ण कामकाज शालार्थ प्रणालीशी संलग्न करुन ऑनलाइन पद्धतीने करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील पूर्णवेळ मान्यताप्राप्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवणे, हिशोब देणे, अग्रीम / परताव्याची देयके अदा करणे इ. बाबी म्हणजेच भविष्य निर्वाह निधीचे संपूर्ण कामकाज दिनांक १ ऑक्टोबर, २०२१ पासून शालार्थ प्रणालीशी संलग्न करुन ऑनलाइन पद्धतीने करण्यात येणार आहे.

२. सदर प्रणालीबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी -

१) मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची भविष्य निर्वाह निधीची दिनांक १ एप्रिल, २०२१ ची आरंभीची शिल्लक अधिक्षक, वेतन व भविष्य निधी पथक यांनी भविष्य निर्वाह निधी प्रणालीवर यांनी दिनांक ३१ डिसेंबर, २०२१ पर्यंत नोंदवावी. दिनांक १ एप्रिल, २०२१ पासून वेतनातून कपात होणाऱ्या भविष्य निर्वाह निधीच्या कपातीची नोंद भविष्य निर्वाह निधी प्रणालीमध्ये आपोआप होईल.

२) दिनांक १ एप्रिल, २०२१ ते ३० सप्टेंबर, २०२१ या कालावधीत अदा करण्यात आलेले अग्रीम व परतावे तसेच याबाबतच्या सर्व देयकांच्या नोंदी अधिक्षक, वेतन व भविष्य निधी पथक यांनी दिनांक ३१ डिसेंबर, २०२१ पर्यंत भविष्य निर्वाह निधी प्रणाली मध्ये घ्याव्यात.

३) मुख्याध्यापक/प्राचार्य (आहरण व संवितरण अधिकारी-१) यांनी दिनांक १ ऑक्टोबर, २०२१ पासून भविष्य निर्वाह निधीबाबतची सर्व प्रकारचे अग्रिम, परतावा देयके भविष्य निर्वाह निधी प्रणाली मार्फत ऑनलाइन पद्धतीने तसेच हार्ड कॉपीमध्ये अधिक्षक, वेतन व भविष्य निधी पथकास सादर करावीत. तसेच अशी देयके सादर करण्यापूर्वी संबंधितांच्या दिनांक १ एप्रिल, २०२१ ची आरंभीची शिल्लक व दिनांक १ एप्रिल, २०२१ ते ३० सप्टेंबर, २०२१ या कालावधीत अदा करण्यात आलेले अग्रीम व परतावे तसेच याबाबतच्या सर्व देयकांच्या नोंदी घेतल्याची खातरजमा करण्यात यावी.

४) त्यानंतर अधिक्षक, वेतन व भविष्य निधी पथकाने सदर देयक भविष्य निर्वाह निधी प्रणालीद्वारे मंजूरी देवुन कोषागार कार्यालयास विहित पध्दतीने सादर करावी.

३. सदर प्रणालीचे कामकाज अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक यांनी शिक्षणाधिकारी/शिक्षण निरिक्षक यांचे नियंत्रणाखाली करावे. तसेच सर्व संचालकांनी सदर प्रणालीचे संनियंत्रण करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१७१५१५१२४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2021.09.17 15:16:36 +05'30'

**( इ.मु.काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई,
२. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
३. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण भवन, वाशी, नवी मुंबई
४. उप-मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/औरंगाबाद /नाशिक /अमरावती
५. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक
६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८. सर्व शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक
१०. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक)
११. शिक्षण निरीक्षक, बृहनमुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
१२. निवडनस्ती